**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट-अ मधील पदव्युत्तर पदविका व पदव्युत्तर पदवी अर्हताधारकांस अनुक्रमे ३ व ६ प्रोत्साहनपर वेतनवाढी मंजूर करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकःवेतन-१५१४/प्र.क्र.३८५/सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत संकुल, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
दिनांक :२० ऑगस्ट,२०१४

संदर्भ :-

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः मवैअ २०११/प्र.क्र.७७६/सेवा-३, दिनांक १४.१२.२०११**

२) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकःमवैअ २०११/प्र.क्र.७७६/११/सेवा-३, दिनांक १९.११.२०१२**

प्रस्तावना:-

सार्वजनिक आरोग्य विभागातील ग्रामीण रुग्णालये, उपजिल्हा रुग्णालये, जिल्हा रुग्णालये, स्त्री रुग्णालये, मनोरुग्णालये व अतिविशिष्ठ सेवा रुग्णालये या संस्थामधून रुग्णांना आरोग्य सेवा देण्यासाठी विशेषज्ञ अधिकाऱ्यांची पदे निर्माण करण्यात आली आहेत. तथापि, सदरहू संस्थामध्ये रुग्णांना पुरेशा सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी विशेषज्ञ वैद्यकीय अधिकाऱ्यांची कमतरता भासत असल्याने विविध विषयातील पदव्युत्तर पदवी /पदव्युत्तर पदविका धारक उमेदवारांना वैद्यकीय अधिकारी पदावर आकर्षित करण्याच्या दृष्टीने संदर्भ क्र .१ येथील दिनांक १४.१२.२०११ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट अ मध्ये वैद्यकीय अधिकारी (वेतनबँड रु.१५६००-३९१०० ग्रेड पे ५४००) या पदावर नियुक्ती झाल्यानंतर पदव्युत्तर पदविका धारकास ३ व पदव्युत्तर पदवी धारकास ६ प्रोत्साहनपर अतिरिक्त वेतनवाढी लागू करण्यात आल्या आहेत.

तसेच संदर्भीय क्र. २ येथील शासन निर्णयान्वये दिनांक १४.१२.२०११ च्या शासन निर्णयाची व्याप्ती वाढवून महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट-अ मधील वैद्यकीय अधिकारी (वेतनबँड रु.१५६००-३९१०० ग्रेड पे ५४००) या संवर्गात दिनांक १४.१२.२०११ रोजी कार्यरत असलेल्या व तद्नंतर वरिष्ठ पदावर पदोन्नत झालेल्या व आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत वरिष्ठ पदाची वेतनश्रेणी प्राप्त असलेल्या पदव्युत्तर पदवी /पदव्युत्तर पदविका अर्हताधारक वैद्यकीय अधिकाऱ्यांनाही संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार अनुज्ञेय करण्यात आलेल्या प्रोत्साहनात्मक वेतनवाढीचा लाभ अनुज्ञेय करण्यात आला आहे.

संदर्भीय क्र. १ व २ येथील शासन निर्णयांन्वये फक्त वैद्यकीय अधिकारी (वेतनबँड रु.१५६००-३९१०० ग्रेड पे ५४०० ) या पदावर कार्यरत असलेल्या पदव्युत्तर पदवी /पदव्युत्तर पदविका धारकांस ३ व ६ अतिरिक्त वेतनवाढी लागू असल्याने सदर वैद्यकीय अधिकारी व त्यांच्यापेक्षा वरिष्ठ पदावर कार्यरत असणाऱ्या अधिकाऱ्यांच्या वेतनामध्ये तफावत निर्माण झाली आहे. वैद्यकीय अधिकाऱ्यांचे वेतन वरिष्ठ श्रेणीतील

अधिकाऱ्यांच्या वेतनापेक्षा जास्त होत आहे. सदर वेतन तफावत दूर करण्यासाठी तसेचविभागाच्या अधिपत्याखालील वरिष्ठ पदांवर उमेदवारांना आकर्षित करण्यासाठी व शासन सेवेतील अधिकाऱ्यांना शासन सेवेत टिकवून ठेवण्यासाठी महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट अ मधील वेतन बँड रु १५६००-३९१०० ग्रेड पे ६६०० व याहून अधिक वेतनश्रेणीच्या पदावर कार्यरत असणाऱ्या अधिकाऱ्यांना दिनांक १४.१२.२०११ च्या शासन निर्णयाच्या धर्तीवर प्रोत्साहनपर वेतनवाढी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट अ मधील वेतनबँड रु १५६००-३९१०० ग्रेड पे ६६०० व याहून अधिक वेतनश्रेणीच्या पदावर कार्यरत असणाऱ्या विशेषज्ञ संवर्ग, जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्ग, जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील, पोलीस शल्य चिकित्सक तसेच उपसंचालक,सहसंचालक, अतिरिक्त संचालक व संचालक, आरोग्य सेवा या पदावरील पदव्युत्तर पदविका व पदव्युत्तर पदवी शैक्षणिक अर्हताधारक अधिकाऱ्यांना अनुक्रमे ३ व ६ अतिरिक्त प्रोत्साहनात्मक वेतनवाढी मंजूर करण्यात येत आहेत.

२. सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून या प्रोत्साहनात्मक वेतनवाढी लागू राहतील.

३. ज्या अधिकाऱ्यांनी शासन निर्णय दिनांक १४.१२.२०११ व दिनांक १९.११.२०१२ मधील तरतुदींनुसार प्रोत्साहनपर वेतनवाढीचा लाभ अनुज्ञेय आहे, अशा अधिकाऱ्यांना या शासन निर्णयाचा पुन्हा लाभ अनुज्ञेय ठरणार नाही.

४. जे अधिकारी एकापेक्षा अधिक पदव्युत्तर पदविका धारण करीत आहेत, त्यांना कमाल ३ वेतनवाढी अनुज्ञेय राहतील. तसेच जे अधिकारी पदव्युत्तर पदवी अथवा पदव्युत्तर पदविपेक्षा अधिक शैक्षणिक अर्हता धारण करीत आहेत, अशा अधिकाऱ्यांना कमाल ६ वेतनवाढी अनुज्ञेय राहतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र.२०१४०८२०१९०५५१८७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JADHAV RAMCHANDRA S

Digitally signed by JADHAV RAMCHANDRA S
DN: CN = JADHAV RAMCHANDRA S, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = PHD
Date: 2014.08.20 19:37:44 +05'30'

(रा.शं.जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त (कुटुंब कल्याण) तथा संचालक राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, मुंबई
२) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य एडस नियंत्रण सोसायटी, वडाळा,मुंबई
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना सोसायटी, वरळी, मुंबई

४) संचालक आरोग्य सेवा, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , मुंबई
६) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व परिमंडळ)
७) जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
८) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
९) मुख्य प्रशासकीय अधिकारी (सर्व)
१०) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर
१२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१३) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१४) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२), मंत्रालय, मुंबई
१५) वित्त विभाग (सेवा-९) मंत्रालय, मुंबई
१६) मा.मंत्री/ मा.राज्यमंत्री, सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे स्वीय सचिव
१७) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
१८) सचिव (२), सार्वजनिक आरोग्य विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
१९) निवडनस्ती (सेवा-२)